मुंबई मेट्रो मार्ग-९ (दहीसर ते मीरा-भाईंदर) व मार्ग-७अ (अंधेरी-छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय विमानतळ) प्रकल्पासाठी राज्यशासनाचे दुय्यम कर्ज मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास वितरीत करण्याबाबत. (सन २०२५-२६)

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२५/प्र.क्र.१०२/नवि-७**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २९ मे, २०२५.**

**पहा :-**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमआरडी-३३१५/प्र.क्र.११३/नवि-७, दिनांक १७ ऑक्टोबर,२०१५.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमआरडी-३३१७/प्र.क्र.१३८/नवि-७, दिनांक २ नोव्हेंबर, २०१८ (बिनव्याजी दुय्यम कर्ज).
३. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७ एप्रिल, २०२५.
४. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमआरडी-३३२४/प्र.क्र.९९/नवि-७, दि.१९ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :**

मुंबई मेट्रो मार्ग-९ (दहीसर ते मीरा-भाईंदर) व मार्ग-७अ (अंधेरी-छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय विमानतळ) या मेट्रो प्रकल्पाची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत अंमलबजावणी करण्यास राज्य शासनाने दि.०२.०८.२०१८ रोजी मान्यता दिली आहे. सदर प्रकल्पावरील केंद्र शासनाच्या कर (५०%), राज्यस्तरीय/स्थानिक कर (१००%), जमिनीवरील खर्च यावरील खर्चासाठी राज्य शासनाकडून रु.१६३१.२४ कोटी बिनव्याजी स्वरूपात दुय्यम कर्ज मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला द्यावयाचे आहेत. सदर दुय्यम कर्जाची परतफेड प्रकल्प अंमलबजावणी संस्था म्हणून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने करावयाची आहे.

मुंबई मेट्रो मार्ग-९ व मार्ग-७अ प्रकल्पासाठी चालू वित्तिय वर्ष सन २०२५-२६ मध्ये राज्य शासनाचे दुय्यम कर्ज सहाय्य या प्रयोजनाकरिता रु.६०.०० कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. उक्त तरतूदीमधून **रु.१०.२० कोटी** मुंबई मेट्रो मार्ग-९ व मार्ग-७अ प्रकल्पासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. मुंबई मेट्रो मार्ग-९ (दहीसर ते मीरा-भाईंदर) व मार्ग-७अ (अंधेरी-छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय विमानतळ) प्रकल्पासाठी राज्य शासनाकडून दुय्यम कर्ज म्हणून **रु.१०,२०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी वीस लाख फक्त)** इतकी रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास प्रदान करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम "मागणी क्र. एफ-७ ६२१७- नगर विकासासाठी कर्जे, ६०, इतर नगर विकास योजना, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे राज्य योजना, (००) (०५) मुंबई मेट्रो लाईन-९ व ७अ प्रकल्पाकरिता एमएमआरडीएला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज ५५ - कर्जे व आगाऊ रक्कमा सांकेतांक क्रमांक (६२१७०९४८)" या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी.सदर निधी वितरण हे **बिनशर्त** स्वरुपाचे आहे.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यास मंजुरी प्राप्त रक्कम **रु.१०.२० कोटी** अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरीत करून ती मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांच्याकडे वर्ग करावी. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि- ३१ कार्यासनाने करावी.

४. राज्य शासनाकडून दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून **रु.१०.२० कोटी** रक्कम मुंबई मेट्रो मार्ग-९ (दहीसर ते मीरा-भाईंदर) व मार्ग-७अ (अंधेरी-छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय विमानतळ) प्रकल्पासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत केंद्रीय कर (५०%) व राज्यस्तरीय/स्थानिक कर (१००%) व जमीन यावरील खर्चासाठी वितरीत करण्यात येत आहे.

५. राज्य शासनाकडून दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून वितरीत रक्कम **रु.१०.२० कोटी** मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून सदर प्रकल्पासाठी बाह्य वित्तीय संस्थाकडून घेतलेल्या मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर वसूल करण्यात यावी.

६. सदर कर्ज सहाय्याच्या रक्कमेवर भविष्यात व्याज आकारणी करण्याबाबत शासनाने निर्णय घेतल्यास कर्जाची परतफेड त्याच्या व्याजाच्या रक्कमेसह सदर प्रकल्पाचे मुख्य कर्जाची परफेड केल्यानंतर एका हप्त्यात करण्यात यावी.

७. मुंबई मेट्रो मार्ग-९ (दहीसर ते मीरा-भाईंदर) व मार्ग-७अ (अंधेरी-छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय विमानतळ) प्रकल्पाकरिता राज्य शासनाकडून केंद्रीय कर (५०%) व राज्यस्तरीय/स्थानिक कर (१००%) व जमीन यावरील खर्चापोटी प्राप्त झालेली रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे जमा झाल्याचे प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

८. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशिल शासनास सादर करण्यात यावा.

९. सदर प्रकल्पासाठी केंद्र शासनाकडून तसेच राज्य शासनामार्फत केंद्रीय कर (५०%) व राज्यस्तरीय/स्थानिक कर (१००%) व जमीन यावरील येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त होणाऱ्या रक्कमांसाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने स्वतंत्र लेखे ठेवावेत.

१०. राज्य शासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर कर्जासाठी राज्यशासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

११. सदर कर्ज सहाय्याच्या वितरणाबाबत शादिक-२०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी दिनांक ३०/१२/२०१४ मधील सूचनानुसार महाऋण आज्ञावलीत **जोडपत्र-अ** (सोबत जोडले आहे) नुसार माहिती भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

१२. राज्य शासनाकडून मुंबई मेट्रो मार्ग-९ व मार्ग-७अ प्रकल्पाकरीता आतापर्यंत **रु. १५५.०० कोटी** इतका निधी दुय्यम कर्जसहाय्य म्हणून वितरीत करण्यात आला आहे. सदर आदेशान्वये वितरीत होणाऱ्या निधीनंतर एकूण वितरीत निधीची परिस्थिती खालीलप्रमाणे:-

| अनु.क्र. | दिनांक | रक्कम (रु.कोटी) | निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव | एकूण वितरीत निधी (रु.कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | २५.०८.२०२२ | २१.०० | राज्य शासन | २१.०० |
| २ | २१.०३.२०२३ | १४.०० | राज्य शासन | ३५.०० |
| ३ | ०४.०७.२०२३ | १२.०० | राज्य शासन | ४७.०० |
| ४ | २९.०८.२०२३ | १८.०० | राज्य शासन | ६५.०० |
| ५ | ०५.०३.२०२४ | ३०.०० | राज्य शासन | ९५.०० |
| ६ | २४.०६.२०२४ | १९.९९८० | राज्य शासन | ११४.९९८० |
| ७ | २४.१२.२०२४ | २२.००२० | राज्य शासन | १३७.०० |
| ८ | १९.०३.२०२५ | १८.०० | राज्य शासन | १५५.०० |
| ९ | सदरचे वितरण | १०.२० | राज्य शासन | **१६५.२०** |

१३. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७ एप्रिल, २०२५ सोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

१४. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७ एप्रिल, २०२५ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहेत.

१५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२९१६५५४३२८१२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2025.05.29 16:55:49 +05'30'

**[विजय चौधरी]**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
४. सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
९. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३. वित्त विभाग कार्यासन- व्यय-३, अर्थसंकल्प-१६, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग (कार्यासन १४४४), मंत्रालय, मुंबई.
१५. सह सचिव नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. कक्ष अधिकारी नवि-४/नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ .
१७. रोख शाखा (नवि) (३ प्रती), मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती, नवि-७.

**शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२५/प्र.क्र.१०२/नवि-७ दि. २९ मे, २०२५ चे सहपत्र**

**जोडपत्र-अ**

**मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांना मुंबई मेट्रो मार्ग-९ (दहीसर ते मीरा-भाईंदर) व मार्ग-७अ (अंधेरी-छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय विमानतळ) या प्रकल्पासाठी सन २०२५-२६ मध्ये रु.१०.२० कोटीचे दुय्यम कर्ज सहाय्य वितरीत करण्याबाबत.**

| अ.क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| १. | संस्थेचे नांव | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे(पूर्व), मुंबई-४०० ०५१ |
| २. | वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक व दिनांक | वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७ एप्रिल, २०२५ |
| ३. | कर्जाची एकूण मंजूर रक्कम | रु.१६३१.२४ कोटी |
| ४. | मंजूर कर्जापैकी यापूर्वी कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आली असल्यास वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम | सन २०२२-२३ रु.३५ कोटी<br>सन २०२३-२४ -६० कोटी<br>सन २०२४-२५ रू.६० कोटी |
| ५. | मंजूर कर्जापैकी सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली कर्जाची रक्कम | **रु. १०.२० कोटी** |
| ६. | एकापेक्षा अनेक सहकारी संस्था, व्यक्ती/यांना कर्ज मंजूर करण्यात आले असल्यास त्यांच्या नावासमोर, कर्ज मंजूरी रक्कम नमूद करण्यात यावी | - |
| ७. | एकूण कर्ज परतफेडीचे हप्ते | एका हप्त्यात |
| ८. | कर्ज परतफेडीचे हप्त्याची रक्कम | **रु.१०.२० कोटी** |
| ९. | कर्ज परतफेडीचे हप्त्याच्या कालावधी, जसे वार्षिक/सहामाही/त्रैमासिक इत्यादी | वार्षिक |
| १०. | कर्ज परतफेडीसाठी सवलतीचा कालावधी (Moratorium Period) | नाही |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2025.05.29 16:56:00 +05'30'

**[विजय चौधरी]**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

| | | |
|---|---|---|
| ११. | कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या निश्चित केलेला कर्ज हप्त्याचा दिनांक | मुख्य कर्जाच्या अटी व शर्ती निश्चित झाल्यानंतर कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या दिनांकाबाबत निश्चिती होईल. |
| १२. | कर्ज परतफेडीच्या पहिल्या हप्त्याचा दिनांक | मुद्दा क्र.११ प्रमाणे |
| १३. | कर्ज परतफेडीच्या शेवटच्या हप्त्याचा दिनांक | मुद्दा क्र.११ प्रमाणे |
| १४. | व्याज दर | बिनव्याजी कर्ज |
| १५. | विलंब कालावधीसाठी दंडनीय व्याजदर व इतर आकार | लागू नाही. |
| १६. | व्याजाचा परतफेडीच्या हप्त्याचा कालावधी जसे वार्षिक/त्रैमासिक/सहामाही इत्यादी | लागू नाही. |
| १७. | कर्जाच्या खर्चाकरीता लेखाशिर्ष | मागणी क्र. एफ-७ ६२१७- नगर विकासासाठी कर्जे, ६०, इतर नगर विकास योजना, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे राज्य योजना, (००) (०५) मुंबई मेट्रो लाईन-९ व ७अ प्रकल्पाकरिता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज ५५ - कर्जे व आगाऊ रक्कमा सांकेतांक क्रमांक (६२१७०९४८) |
| १८. | कर्जाच्या वसूलीचे लेखाशिर्ष | नवीन लेखाशिर्ष घेण्यात येत आहे. |
| १९. | कर्जावरील व्याज/दंडनिय व्याज वसूलीचे लेखाशिर्ष | लागू नाही. |
| २०. | कर्जाशी संबंधित असलेल्या सहकारी संस्था यांचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | लागू नाही. |
| २१. | शासकिय कंपनीच्या नोडल ऑफीसचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | मुख्य लेखा अधिकारी<br>मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,<br>वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे(पूर्व), मुंबई. |
| २२. | डी. डी.ओ.चा नंबर | कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग,<br>मंत्रालय, मुंबई.<br>डी. डी.ओ. नंबर- ७१०१००२३०१ |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2025.05.29 16:56:09 +05'30'

**[विजय चौधरी]**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**